**नव्याने स्थापित जिल्हा महिला व बाल रुग्णालय, यवतमाळ जि. यवतमाळ करीता कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- २०२२/ प्र.क्र. ११ / आरोग्य-३**

१० वा मजला, ए विंग ,गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल इमारत,

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१

दिनांक: ४ मार्च, २०२२

वाचा -

१) **सा.आ. वि., शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०२०/प्र.क्र.४४/आ-३,दिनांक. ०७.०६.२०२१**

२) **सहसंचालक,आरोग्य सेवा,रुग्णालय(राज्यस्तर),मुंबई यांचे क्रं.संआसे /राज्यस्तर : कक्ष-३/टे-७/जिल्हा स्त्री रुग्णालय.यवतमाळ आहरण व संवितरण /नस्ती क्रमांक ७५ /७९३-२२, दि.१८.१.२०२२ चे पत्र**

**प्रस्तावना**

जिल्हा महिला व बाल रुग्णालय, यवतमाळ जि. यवतमाळ या रुग्णालयाकरीता उपरोक्त दि. ०७.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ नुसार प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर रूग्णालयाकरीता कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

जिल्हा महिला व बाल रुग्णालय, यवतमाळ जि. यवतमाळ या रुग्णालयाकरीता "वैद्यकीय अधिक्षक" या मंजूर पदास कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय १७ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रसिद्ध वित्तीय अधिकार नियम पुस्तिका नियम क्र. २ नुसार प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२९/२२/को.प्र.५, दि.०१/०२/२०२२ अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०२१२४२५६२४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2022.03.04 15:02:51 +05'30'

**(रो.दि. कदम-पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त ( आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान , मुंबई.

२. महालेखापाल ( लेखा परीक्षा) / (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

३. संचालक -१, आरोग्य सेवा, मुंबई.

४. अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.

५. उप संचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.

६. वैद्यकीय अधिक्षक, जिल्हा महिला व बाल रुग्णालय, यवतमाळ जि. यवतमाळ.

७. जिल्हा शल्य चिकित्सक, यवतमाळ.

८. जिल्हा आरोग्य अधिकारी, यवतमाळ.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.

१०. निवडनस्ती ( आ-३)